**मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाव्दारे राबविण्यात येत असलेल्या पायाभूत विकास प्रकल्पांसाठी मे. पॉवर फायनान्स कॉर्पोरेशन लिमिटेड (PFCL) या वित्तीय संस्थेकडून तिसऱ्या टप्प्यातील रु.१०,००० कोटी कर्जाच्या रकमेस शासन हमी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : शाहमी- २०२२/नविवि/प्र.क्र.६३/अर्थबळ,**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :-०९/०४/२०२५

**वाचा** - १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शाहमी-१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी, दि.२८.४.२००८
३) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमआरडी-३३२२/प्र.क्र.८३/नवि-७ दि.१७.०८.२०२२
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शाहमी -२०२२/नविवि/प्र.क्र.६३/अर्थबळ,दि.१८.११.२०२२
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शाहमी -२०२२/नविवि/प्र.क्र.६३/अर्थबळ,दि.०९.१२.२०२२
६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शाहमी -२०२२/नविवि/प्र.क्र.६३/अर्थबळ,दि.१५.०२.२०२३
७) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शाहमी -२०२२/नविवि/प्र.क्र.६३/अर्थबळ,दि.३०.०१.२०२५

**प्रस्तावना:**

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत (एमएमआरडीए) मुंबई महानगर प्रदेश क्षेत्रात विविध पायाभूत विकासाची कामे हाती घेण्यात आलेली आहेत. राज्य शासनाने वाचा क्र.३ अन्वये प्रा धीकरणाकडील महत्वाकांक्षी प्रकल्प (चालू व प्रस्तावीत) पूर्ण करण्यासाठी प्राधीकरणास आवश्यकतेनुसार रु.६०,००० कोटीपर्यंतचे कर्ज उभारण्यास शासनाची मान्यता देण्यात आल्याची व त्यातील हिल्या टप्प्यात रु.१२,००० कोटी कर्ज रकमेस दिलेल्या शासन हमीच्या धर्तीवर दुसऱ्या टप्प्यात आर.ई.सी.एल. कडून रु.१२,००० कोटी व तिसऱ्या टप्प्यात पी.एफ.सी.एल. कडून रु.१२,००० कोटी असे एकूण रु.२४,००० कोटी कर्ज घेण्यासाठी शासन हमी देण्याबाबत निर्णय झाला आहे. त्यानुषंगाने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत (एमएमआरडीए) मुंबई महानगर प्रदेश क्षेत्रात विविध पायाभूत विकासाच्या कामासाठी वाचा येथील अ.क्र.४ च्या शासन निर्णयान्वये रुरल इलेक्ट्रिफिकेशन कॉर्पोरेशन लि. (REC) या वित्तीय संस्थेकडून रु.१२,००० कोटी कर्ज उभारण्यास शासन हमी देण्यात आली असून, शासन हमीवरील हमी शुल्क माफ करण्यात आले आहे.

मा.मंत्रीमंडळाच्या दि.११.०३.२०२४ रोजीच्या बैठकीत सन २०२४-२५ या वर्षात वित्तीय संस्थांकडून दुस-या व तिस-या टप्प्यातील प्रत्येकी रु.१२,००० कोटी अशा एकूण रु.२४,००० कोटी कर्ज रकमेस शासन हमी देण्यास मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुषंगाने वाचा येथील अ.क्र.७ च्या शासन निर्णयान्वये रुरल इलेक्ट्रिफिकेशन कॉर्पोरेशन लि. (REC) या वित्तीय संस्थेकडून दुसऱ्या टप्प्यात रु.१२,००० कोटी कर्ज उभारण्यास शासन हमी देण्यात आली आहे. सदर बाब विचारात घेता, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या प्रकल्पांसाठी तिस-या टप्प्यात मे. पॉवर फायनान्स कॉर्पोरेशन लिमिटेड (PFCL) या वित्तीय संस्थेकडून घेण्यात येणाऱ्या एकूण रु.१०,००० कोटी कर्ज रकमेस शासन हमी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाद्वारे राबविण्यात येणाऱ्या विविध पायाभूत विकास प्रकल्पांसाठी आवश्यक असलेला तिसऱ्या टप्प्यातील रु.१०,००० कोटी (अक्षरी रुपये दहा हजार कोटी फक्त) इतका निधी मे. पॉवर फायनान्स कॉर्पोरेशन लिमिटेड (PFCL) या वित्तीय संस्थेकडून कर्ज स्वरुपात उभारण्यास शासन हमी मंजूर करण्यात येत आहे. मा. मंत्रीमंडळाने शासन हमीवर उभारण्यात येणारे कर्ज हे सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात घेण्यास मान्यता प्रदान केली आहे. सन २०२४-२५ हे आर्थिक वर्ष संपल्याने सदर शासन हमीस मा. मंत्रीमंडळाची कार्योत्तर मंजूरी घेण्याच्या अटीच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन हमीवर कर्ज उचलण्याची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून १२ महिन्यांच्या कालावधीपर्यंत वैध राहील.

३. वित्तीय संस्थेसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तीचा समावेश करण्यात यावा.

३.१) शासन हमी एकूण रु.१०,००० कोटी इतक्या रकमेपुरतीच सिमीत राहील.

३.२) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने वित्तीय संस्थांकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

३.३) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसूरीची सूचना शासनास ९० दिवसाच्या आत देणे संबंधित वित्तीय संस्थेस बंधनकारक असेल.

३.४) धनको संस्था ही राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही. तसेच सदर प्रयोजनासाठी ऋणको अन्य कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणार नाही.
वरील (३.१) ते (३.४) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास, शासन हमी अवैध होईल.

३.५) वित्तीय संस्थेकडून प्राप्त होणारे कर्ज, प्रकल्पातून प्राप्त होणारी रक्कम व वित्तीय संस्थेची परतफेड याकरिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या नावे स्वतंत्र Escrow A/C उघडण्यात येईल व या अकाऊन्टमधून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यात येईल.

४. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला रु.१०,००० कोटीची शासन हमी संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०५.११.१९९९ मधील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहील :-

४.१) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण ही Principal Debtor राहील.

४.२) सदर धनकोकडून घेण्यात येणाऱ्या कर्जाचा वापर ज्या उद्दिष्टासाठी कर्ज घेण्यात आले आहे त्यासाठीच करण्यात यावा.

४.३) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने आवश्यक तेवढयाच कर्जाची उचल करावी.

४.४) सदरचे कर्ज (मुद्दल व व्याज) फेडण्याची संपूर्ण जबाबदारी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची राहील.

४.५) धनकोकडून कर्ज घेताना रिझर्व्ह बँकेच्या प्रचलित बँक दराचा विचार करुन त्यानुसार व्याजाचा दर कमीत कमी असेल याची खात्री करण्याची संपूर्ण जबाबदारी नगर विकास विभाग/मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांची राहील.

४.६) सदर शासन हमीवर देण्यात आलेल्या कर्जाचे दायित्व शासनावर येणार नाही, याबाबत नगर विकास विभागाने दक्षता घ्यावी.

४.७) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती नगर विकास विभागाकडे / वित्त विभागाकडे सादर करावी.

४.८) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने विहित कार्यपध्दतीने लेखा परीक्षित केलेल्या लेख्यांची एक प्रत शासनास सादर करावी.

४.९) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण त्यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये दर सहा महिन्यांनी (३१मार्च/३० सप्टेंबर) नगर विकास विभागास सादर करेल.

५. **हमी शुल्क**

मा.मंत्रीमंडळाच्या दि.११.०३.२०२४ च्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार सदर शासन हमीवरील हमी शुल्क माफ करण्यात येत आहे. तथापि, शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव/ उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

६. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला कर्ज घेण्याच्या अनुषंगाने संबंधित वित्तीय संस्थांसोबत करण्यात येणाऱ्या करारपत्रांवर स्वाक्षरी करण्याकरिता नगर विकास विभागातील संबंधित सह सचिव/ उप सचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय मा.मंत्रीमंडळाच्या दि.११.०३.२०२४ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने, नगर विकास विभागाच्या नस्ती क्र.एमआरडी-३३२४/प्र.क्र.२०७/नवि-७ वरील प्रस्तावाच्या व वित्त विभागाचा शासन हमी क्र.७/२०२४-२५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०४०९१७१६१९८८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SUNIL SHANKAR SHINDE
Date: 2025.04.09 17:18:07 +05'30'

**( सुनिल शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.

२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
८) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव.
९) मा.उप मुख्यमंत्री(वित्त) महोदयांचे खाजगी सचिव.
१०) मा.उप मुख्यमंत्री(नगर विकास व सार्व. बांधकाम(सार्व. उपक्रम)) महोदयांचे प्रधान सचिव.
११) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती)
१५) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२०.
१६) इंडियन नॅशनल कॉग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०००२५.
१७) नॅशनॅलिस्ट कॉग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन. हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई.
१८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८.
१९) बहुजन समाज पार्टी,म.रा.,बी.एस.पी. भवन, प्लॉट नं.८३-ए,कलेक्टर कॉलनी चेंबूर, मुंबई-४०००१४.
२०) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई-०४.
२१) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी महाराष्ट्र कमिटी,जनशक्ती हॉल,ग्लोब मिल पॅलेस, वरळी,मुंबई-२८.
२२) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.
२३) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४) व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रे कॉर्पोरेशन लि., एमएमआरसी ट्रान्सिट ऑफीस बिल्डींग, ए-विंग, ई-ब्लॉक, आयकर विभाग कार्यालयाच्या मागे, वांद्रे कुर्ला संकुल, वांद्रे पूर्व, मुंबई-४०० ०५१.
२५) वित्त विभाग (साउ / व्यय-३ / ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
२६) कार्यासन अधिकारी-नवि-७, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.
२७) संबंधित वित्तीय संस्था (विभागामार्फत).
२८) निवड नस्ती -अर्थबळ.

2294.1[?]

# ANNEXURE A

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from:** **To**

**Guarantee & Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Toal Outstanding (1+2) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period (3-4) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance (5-6) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G. F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No | | | |
| 5 | Balance at end of the period (1-2) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (i) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

(P.T.O.)

| | |
|---|---|
| 9 Types of inspection of assets / due diligency by lending institute during last 6 months to ensure loans are properly secured. | |
| 10 Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the Principal Debtor<br>(II) Total Profits<br>(III) % of profits as % of loan amount | |
| 11. Is in the opinion of lending institute,the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| 12 Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| 13. If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| 14 Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| 15. Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |